**दिनांक १० ते १५ फेब्रुवारी,२०१५ या कालावधीत चेन्नई, तामिळनाडू येथे आयोजित अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा (२०१४-१५) मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी झालेल्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अभानासे- ३८१८ /प्र.क्र.११८/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३० ऑगस्ट, २०१८

वाचा :- (१) केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ क्रमांक- ५९/२/२०१४-१५/ सीसीएससीएसबी यांचे दिनांक ०७.१०.२०१४ चे पत्र.
(२) सचिवालय जिमखान्याचे पत्र क्र.-अभानासे/ बॅडमिंटन /२०१४-१५, दि.०१.०२.२०१८
(३) उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक-उपसंक्री / अभानासे/१८-१९/का-४/१५२८, दि.२७.०७.२०१८.

**शासन निर्णय:**

**दिनांक १० ते १५ फेब्रुवारी,२०१५ या कालावधीत चेन्नई, तामिळनाडू** येथे पार पडलेल्या **अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा २०१४-१५** मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता सचिवालय जिमखाना, मुंबई येथे दि.०९.०१.२०१५ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या ४१ अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तर निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेला राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्य संघाच्या सदर स्पर्धेतील सहभागासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे **रु.५४,६४०/-( रुपये चोपन्न हजार सहाशे चाळीस फक्त)** इतक्या खर्चास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना सदर रक्कम आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. संघातील ज्या खेळाडूंना किट बॅग्ज व ट्रॅकसूट मिळालेले आहेत ते खेळाडू कोणत्याही अखिल भारतीय नागरी सेवा क्रीडा स्पर्धेसाठी किटबॅग व ट्रॅकसूट दोन वर्षातून एकदा मिळण्यास पात्र ठरतील. या नियमाचे सचिवालय जिमखान्याने काटेकोरपणे पालन केले असेल, या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

४. दिनांक ०५.०२.२०१५ ते ०७.०२.२०१५ या कालावधीतील प्रशिक्षण शिबीरासाठी व त्यानंतर दिनांक १०.०२.२०१५ ते १५.०२.२०१५ या दरम्यान अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धेत सहभागी झालेल्या खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांना संबंधित विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी दिनांक ०४.०२.२०१५ (म.नं.) पासून कार्यमुक्त करण्यास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

५. संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची प्रशिक्षण शिबीर व स्पर्धा काळातील कार्यालयीन अनुपस्थिती ही शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/ अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ अन्वये "कर्तव्य कालावधी" म्हणून

समजण्यात यावा. तसेच स्पर्धा संपल्यानंतर दोन दिवसानंतर खेळाडूंनी मुख्यालयास परत आले असल्याच्या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. या सर्व संबंधीत खेळाडू यांचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या / कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी / कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै,१९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी व मुंबई बाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास / दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ च्या आधारे विशेष बाब म्हणून मंजूर करण्यात यावी.

या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनाला सादर करणे आवश्यक राहिल.

७. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच जर रक्कम शिल्लक राहिली तर ती उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

८. यासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६)(०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अ.क्र. ५, नियम क्र. ३९(ब) (२) नुसार प्रशासकीय विभागाला दिलेल्या अधिकारा अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परिक्षित लेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र "ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३११२५५०२६९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:12:06 +05'30'

**(राजेंद्र पवार)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, पुणे विभाग, पुणे

३. उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
९. मानद महासचिव, सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०. संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

<u>विवरणपत्र "अ"</u>

दिनांक १० ते १५ फेब्रुवारी २०१५ या कालावधीत चेन्नई (तामिळनाडू) येथे आयोजित करण्यात आलेल्या **अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा २०१४-१५** येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा २०१४-१५ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या बॅडमिंटन संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव व पदनाम | ट्रॅकसूट | किटबॅग | विभाग/ कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १. | डॉ. डेव्हीड अल्वारीस, उपायुक्त | होय | होय | आयुक्त, विक्रीकर कार्यालय, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई. |
| २. | श्री. व्यंकटेश भट, अवर सचिव | होय | होय | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३. | श्री. प्रफुल्ल सोनकांबळे, सहाय्यक सचिव | होय | होय | M.S.B. of Technical Education, Nagpur. |
| ४. | श्री. किरण गावतुरे, अवर सचिव | होय | होय | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ५. | श्री. शक्तीसिंग क्यावल, भूमापक | होय | होय | अधिक्षक, भूमी अभिलेख, शेगाव. |
| ६. | श्री. जितेंद्र निजसुरे, पी.ए. | होय | होय | मुंबई उच्च न्यायालय, मुंबई. |
| ७. | श्री. शैलेश सोमाणी, विक्रीकर उप आयुक्त | होय | होय | विक्रीकर आयुक्त, विक्रीकर कार्यालय, पुणे. |
| ८. | श्री. ना.म. खिलकरवार, लिपिक | होय | होय | विक्रीकर उपायुक्त, (व्हॅट & प्रशासन) रेल्वे स्टेशन, जालना. |
| ९. | श्री. नितीन गायकवाड, अवर सचिव | होय | होय | मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १०. | श्री. धनंजय देशपांडे, सहाय्यक अभियंता | नाही | नाही | बिल्डींग प्रोजेक्ट, सर्वे उपविभाग, सा.बां. विभाग, पुणे. |
| ११. | श्रीमती स्वप्नाली काळे, सहाय्यक | होय | होय | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १२. | सौ. निलीमा चिमोटे, रोखपाल | नाही | नाही | रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १३. | डॉ. अंजली देशपांडे, उप वैद्यकीय अधिकारी | नाही | नाही | रा.का. वि. यो. रुग्णालय, वरळी, मुंबई. |
| १४. | श्रीमती अर्चना सोनवडेकर कनिष्ठ लेखापाल | होय | होय | अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पू), मुंबई. |
| १५. | श्री. अनिरुध्द देशपांडे, स्वीय सहाय्यक, (प्रशिक्षक) | होय | होय | मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १६. | सौ. सीमा साळुंके, उ.श्रे.लघुलेखक (व्यवस्थापक) | होय | होय | गृह विभाग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई. |

Rajendra
Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:12:35 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**विवरणपत्र ”ब“**

दिनांक १० ते १५ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत चेन्नई (तामिळनाडू) येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा २०१४-१५ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या बॅडमिंटन संघासाठी झालेल्या खर्चाचे विवरणपत्र.

| **क्र.** | **तपशील** | **झालेला खर्च रुपये** |
|---|---|---|
| **अ)** | **निवड चाचणी आयोजनापूर्वीचा खर्च.** | |
| १. | निवड चाचणीसाठी ध्वनीक्षेपण यंत्रणा, टेबल, खुर्च्या आणणे, मांडणे व त्यासाठी टेम्पो खर्च (हमालीसह) | १,५००/- |
| **ब)** | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | दोन पंच यांचे मानधन. | १,०००/- |
| २ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी/ प्रतिनिधी व पंच यांच्यासाठी चहा/ अल्पोपहारावरील खर्च. | १,५००/- |
| ३ | निवड चाचणीसाठी ४ बॉक्स शटलकॉक्स (प्रत्येकी रु. ११००/- प्रमाणे) | ४,४००/- |
| ४ | इतर किरकोळ खर्च / झेरॉक्स/ मुद्रण सामग्री /टंकलेखन व इतर खर्च. | ७००/- |
| **क)** | **प्रशिक्षण शिबीराकरिता खर्च.** | |
| १ | **आयोजनाचा खर्च.** (३ दिवसाचा प्रशिक्षण शिबीराकरिता खेळाडू, व्यवस्थापक/ प्रशिक्षण यांच्या चहा व अल्पोपहारावरील खर्च.) | ५,०४०/- |
| २ | ४ बॉक्स शटलकॉक्स (प्रत्येकी रु. ८५०/- प्रमाणे) | ३,४००/- |
| **ड)** | **संघासाठी साहित्य** | |
| १ | २ बॉक्स शटल कॉक्स. | २,२००/- |
| **इ)** | **वैयक्तीक क्रीडा साहित्य खरेदीसाठी होणारा खर्च :-** | |
| १ | १४ ट्रॅकसूट रु. १३५०/- प्रमाणे. | १८,९००/- |
| २ | ३२ टि शर्टस् रु. ५००/- प्रमाणे. | १६,०००/- |
| | एकूण रुपये : (रु. चोपन्न हजार सहाशे चाळीस फक्त) | **५४,६४०/-** |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:13:01 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र "क"

दिनांक १० ते १५ फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत चेन्नई (तामिळनाडू) येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बॅडमिंटन स्पर्धा २०१४-१५ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या संघाची निवड करण्यासाठी दिनांक ९ जानेवारी २०१५ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव पदनाम | विभाग / कार्यालय |
|---|---|---|
| १ | डॉ. डेव्हीढ अल्वारीस, उपायुक्त | आयुक्त, विक्रीकर कार्यालय, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई. |
| २ | सुहास चव्हाण, कक्ष अधिकारी | सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३ | जितेंद्र धनराळे, | मुंबई उच्च न्यायालय, मुंबई. |
| ४ | शक्ती क्यावल, भूमापक | भूमि अभिलेख, शेगाव. |
| ५ | जितेंद्र एस. निजसुरे, पी.ए. | मुंबई उच्च न्यायालय, मुंबई. |
| ६ | प्रफुल्ल सोनकांबळे, सहाय्यक सचिव | M.D.B. of Technical Education, Nagpur |
| ७ | श्री. धनंजय देशपांडे, सहाय्यक अभियंता | बिल्डींग प्रोजेक्ट, सर्वे उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे. |
| ८ | डॉ. एन. एल. पाटील, वैद्यकीय अधिकारी | रा.रा.पो. बल गट क्र.२, पुणे. |
| ९ | राजीव पी. पांडे, जज्ज | लघुवाद न्यायालय, मुंबई |
| १० | डी. एम. करंजे, सहा. विक्रीकर आयुक्त | विक्रीकर सह आयुक्त, (विधी) माझगांव, मुंबई- ४०० ०१० |
| ११ | प्रदीप शर्मा, विक्रीकर अधिकारी | विक्रीकर सह आयुक्त (व्य.ले.प.स.) मुंबई. |
| १२ | सुधीर घोटकर, विक्रीकर उपआयुक्त | विक्रीकर सह आयुक्त, (विधी), माझगांव, मुंबई |
| १३ | शैलेश सी. सोमाणी, विक्रीकर उपआयुक्त | विक्रीकर आयुक्त, पुणे. |
| १४ | सचिन राम वायडा, कनिष्ठ लेखापाल | अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पू), मुंबई |
| १५ | शक्ती चौगुले, कनिष्ठ लेखापाल | अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पू), मुंबई |
| १६ | सतीश कौ. मुळे, कनिष्ठ लिपिक | पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट, बृहन्मुंबई. |
| १७ | अभिजीत अ. शेवते, कनिष्ठ लिपिक | पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट, बृहन्मुंबई. |
| १८ | श्री. व्ही.एम. भट, उप सचिव | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १९ | श्री. रुपेंद्र दि. मोरे, व्यवस्थापक | येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे. |
| २० | श्रीकांत सा. अकोलकर, क. लिपिक | पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट, बृहन्मुंबई. |
| २१ | अमोल सु. शिंपी, वरिष्ठ लिपिक | पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट, बृहन्मुंबई. |
| २२ | धनंजय ब. चव्हाण, कनिष्ठ लिपिक | पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट, बृहन्मुंबई. |
| २३ | किरण गावतुरे, अवर सचिव | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २४ | डॉ. संतोष भोगले, उपसचिव | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २५ | रामचंद्र धनावडे, उपसचिव | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई |
| २६ | नितीन गायकवाड, अवर सचिव | मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई. |

| | | |
|---|---|---|
| २७ | प्रकाश चौधरी, सहाय्यक | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई |
| २८ | अशोक पाडावे, सहाय्यक | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २९ | सौ. निलीमा चिमोटे, रोखपाल | रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३० | सौ. सीमा साळुंके, उ.श्रे. लघुलेखक | गृह विभाग, वल्डे ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई. |
| ३१ | डॉ. अंजली देशपांडे, उप वैद्यकीय अधिकारी | रा.का.वि.यो. रुग्णालय, वरळी, मुंबई -१८. |
| ३२ | श्रीमती नीता सोंडकर,वरिष्ठ श्रेणी लिपिक | पोलीस महासंचालक, शहिर भगतसिंग मार्ग, कुलाबा, मुंबई-१ |
| ३३ | कु. स्वप्नाली मु. काळे, सहाय्यक | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३४ | कु. अर्चना शां. सोनवडेकर, लेखा लिपिक | अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पू), मुंबई |
| ३५ | यामिनी जितेंद्र राजपूत, टेलीफोन ऑपरेटर | कामगार आयुक्त कार्यालय, बांद्रा, मुंबई. |
| ३६ | कु. पोर्णिमा शंकरराव तावरे, सहाय्यक | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३७ | कु. मनस्वी वि. गोंधळी, सहाय्यक | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ३८ | सौ. विधाता वि. लाड, कनिष्ठ लेखापाल | अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पू), मुंबई |
| ३९ | श्रीमती रुपाली श. सोनवणे, सहाय्यक | गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ४० | श्रीमती शितल बा. वाणी, सहाय्यक | गृह विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ४१ | श्रीमती लुंबिनी वालदे, सहाय्यक | नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.31 13:13:30 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**